# सुंदर केळी

मराठी : अश्विनी बर्वे



# सुंदर केळी

मराठी : अश्विनी बर्वे



“अच्छा,आई,” बीटीस म्हणाली, ती तिच्या आजोबांना भेटायला चालली होती. ती त्यांना भेट देण्यासाठी केळीचा सुंदर घड नेत होती.

रस्त्यात तिची भेट जिराफाशी झाली. जिराफाने आपली लांब शेपटी हलवली तेव्हा ती शेपटी बीटीसच्या डोक्यावरच्या घडाला लागली आणि केळी झटकन नदीच्या प्रवाहात पडली.

"ओह, मला माफ कर," जिराफ म्हणाला. मग तो बीटीसला काही फुले देण्यासाठी खाली वाकला. “माझ्या आजोबांना ही आवडतील,” बीटीस म्हणाली.

मग मधमाशांची झुंड फुलांवर बसण्यासाठी त्यांच्याजवळ फिरू लागले. “अरे!” बीटीस रडू लागली. तिने मधमाशांना मारले,त्यामुळे फुले कोमेजून खराब झाली.

बीट्रीस आगे बढ़ी. मधमाश्या म्हणाल्या, “आम्हांला खूप वाईट वाटते आहे.” त्याबदल्यात त्यांनी मधमाशांचे एक पोळे पानामध्ये लपेटून बीटीसला दिले. मग बीटीस पुढे निघाली.





काही मस्तीखोर माकडांनी मधमाशांचे पोळे पाहिले. “आम्हांला मध खूप आवडते!”ते ओरडले. त्यांनी पोळे बीटीस कडून ओढून घेतले.पोळ्यातला सारा मध जमिनीवर सांडला.

“थांबा!” बीटीस म्हणाली. “ते मध माझ्या आजोबांसाठी होते. “अरे बाप रे,” माकडं म्हणाली. ते परत झाडावर चढले आणि मधमाशांच्या पोळ्याच्या बदल्यात त्यांनी बीटीसला झाडावरचे आंबे दिले.

बीट्रीस आंबे घेवून जोरात पुढे जावू लागली.



अचानक एक सिंह बाहेर आला! “अरे बापरे!” बीटीस ओरडली. सिंहाला बघून ती खूप घाबरली.तिच्या हातातून आंबे खाली पडले आणि घरंगळत लांब गेले.

“घाबरू नको,” सिंह म्हणाला. “मला तुला घाबरावयाचे नव्हते.” मग त्याने आपल्या मिशीचा एक केस काढून बीटीसला दिला. बीटीस मिशीचा केस हातात पकडून पुढे निघाली.



एका पोपटाने सिंहाचा केस बघितला.त्याला ती छोटीशी फांदी वाटली. तो झपाट्याने खाली उतरला आणि घरटं करण्यासाठी त्याने केस ओढून नेला. “तो मला परत कर!” बीटीस ओरडली. “तो सिंहाच्या मिशीचा केस माझ्या आजोबांसाठी आहे!”

“माझ्याकडून चूक झाली,” पोपटाने आपली चूक कबूल केली. मग त्याने आपल्या शेपटीतला लांब हिरवा पंख काढला आणि तो बीटीसला दिला. मग बीटीस पुढे निघाली.

पुढे रस्त्यात एक करड्या रंगाची लांब वस्तू पडलेली होती. ती काय होती? बीटीस ने आपल्या जवळच्या पंखाने त्या करड्या रंगाच्या वस्तूला गुदुगुल्या केल्या.

“तू मला गुदगुल्या करतेस!” हत्तीने धाप घेत विचारले. “आ छी!” हत्तीच्या शिंकेने बीटीसच्या हातातील पंख उडून गेल.

हत्तीला आपल्या करणीचे फार दुःख झाले. मग त्याने आपली सोंड वर केली आणि बीटीसला केळीचा एक घड तोडून दिले. बीटीस आनंदाने टाळी वाजवली. “तुमचे खूप आभार” ती म्हणाली. “सगळ्या वस्तूंपेक्षा केळीच जास्त चांगल्या आहेत.”

शेवटी ती आजोबांच्या घरी पोहचली, आजोबांनी तिचे बाहेर येवून स्वागत केले. “मी तुमच्यासाठी काही घेवून आले आहे,” बीटीस म्हणाली. आणि तिने आजोबांना केळीचा सुंदर घड दिला.



समाप्त